महाराष्ट्र संवर्गातील भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांच्या विनिर्दिष्ट पदांना संलग्न असलेल्या विशेष भत्त्याबाबत...

# महाराष्ट्र शासन
## सामान्य प्रशासन विभाग
## शासन निर्णय क्रमांकः भाप्रसे १५१३/प्र.क्र.३४/२०१३/९

मादाम कामा रोड,
हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: १७ सप्टेंबर, २०१४

**वाचा -**

१) **शासन निर्णय, सा.प्र.वि. क्रमांकः भाप्रसे ३००४/प्र.क्र. २७२/०४/०९, दिनांक २८.११.२००५**
२) **केंद्र शासनाच्या कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे कार्यालयीन ज्ञापन क्रमांकः ४/६/२००८-ईएसटीटी (पे-II), दिनांक ०१.१०.२००८**

**प्रस्तावना -**

संदर्भीय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र संवर्गातील भारतीय प्रशासन सेवेतील ९४ पदांना विशेष भत्ता अनुज्ञेय करण्यात आला आहे. आता केंद्र शासनाने त्यांच्या दिनांक ०१.१०.२००८ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये केंद्र शासनाकडील पदांना लागू असलेल्या विशेष भत्त्याच्या दरामध्ये वाढ केली आहे. तसेच महाराष्ट्र संवर्गातील भारतीय प्रशासन सेवेतील पदांचा झालेला संवर्ग आढावा विचारात घेवून राज्यातील भारतीय प्रशासन सेवेतील विशिष्ट पदांना सुधारित दराने विशेष भत्ता अनूज्ञेय करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये सदर शासन निर्णयाच्या परिच्छेद क्रमांक २ मधील ९४ पदांना विशेष भत्ता अनुज्ञेय करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. आता या शासन निर्णयान्वये यापूर्वी ठरविण्यात आलेल्या ९४ पदांऐवजी पुढे नमूद केलेल्या ८४ पदांना विशेष भत्ता मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. विशेष भत्ता अनुज्ञेय असलेली पदे पुढीलप्रमाणे राहतील:

| अनुक्रमांक | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सह सचिव/ उप सचिव | २५ |
| २ | जिल्हाधिकारी | ३५ |
| ३ | अतिरिक्त जिल्हाधिकारी | ०४ |

| अनुक्रमांक | पदनाम | पदांची संख्या |
|---|---|---|
| ४ | नोंदणी महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य | ०१ |
| ५ | अप्पर विक्रीकर आयुक्त | ०१ |
| ६ | विक्रीकर उपायुक्त | ०४ |
| ७ | संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य | ०१ |
| ८ | अतिरिक्त आयुक्त | ०६ |
| ९ | संचालक, हातमाग, यंत्रमाग व सहकारी सूतगिरणी, महाराष्ट्र राज्य | ०१ |
| १० | शिधावाटप नियंत्रक | ०१ |
| ११ | अप्पर आयुक्त, आदिवासी उप-योजना | ०२ |
| १२ | संचालक, क्रिडा व युवक सेवा | ०१ |
| १३ | महासंचालक, माहिती व जनसंपर्क | ०१ |
| १४ | आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य | ०१ |
| | एकूण पदे | ८४ |

भारतीय प्रशासन सेवा (वेतन), नियम, २००७ मधील परिशिष्ट ३ (ब)(२) नुसार वरील परिच्छेदात नमूद केलेल्या ८४ पदांवर कार्यरत असलेल्या भारतीय प्रशासन सेवेतील अधिकाऱ्यांना खालील विवरणपत्रात त्यांच्या वेतन श्रेणीसमोर दर्शविलेल्या दराने विशेष भत्ता प्रदान करण्यास शासनाची मंजूरी देण्यात येत आहे.

| वेतनश्रेणी | विशेष भत्त्याचा दर |
|---|---|
| वरिष्ठ समय श्रेणी (Senior Time Scale)<br>पीबी-३ (१५६००-३९१००) अधिक ग्रेड पे रु. ६६०० | रु. ६००/- दरमहा |
| कनिष्ठ प्रशासकीय श्रेणी (Junior Administrative Grade)<br>पीबी-३ (१५६००-३९१००) अधिक ग्रेड पे रु. ७६०० | रु. ८००/- दरमहा |
| निवड श्रेणी (Selection Grade)<br>पीबी-४ (३७४००-६७०००) अधिक ग्रेड पे रु. ८७०० | रु. १०००/- दरमहा |

यावर होणारा खर्च संबंधित भारतीय प्रशासन सेवेतील अधिकारी यांचे वेतन व भत्ते यावरील खर्च ज्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो, त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या लेखाशीर्षाखाली वेळोवेळी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून भागविण्यात यावा. सदर विशेष भत्ता या शासन निर्णयाच्या दिनांकाच्या पुढील महिन्याच्या वेतनापासून अनुज्ञेय राहील.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १५८/२०१४/सेवा-९, दिनांक ०४.०६.२०१४ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०९१७११३१३२९८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरी ने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UMARANIKAR SUBHASH H

Digitally signed by UMARANIKAR SUBHASH H
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=GAD, postalCode=400032, st=Maharashtra, cn=UMARANIKAR SUBHASH H
Date: 2014.09.17 13:32:00 +05'30'

**(सु.ह.उमराणीकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४. मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र,मुंबई/नागपूर
८. अधिदान लेखा अधिकारी, मुंबई
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१०.वित्त विभाग (सेवा-९), मंत्रालय, मुंबई
११.कार्यासन ९अ/१०, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२.भाप्रसे संवर्गातील संबंधित सर्व अधिकारी
१३.निवड नस्ती (कार्यासन-९)